**महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळास (MIEB) निधी उपलब्ध करुन देणे व अधिकार प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शैगुवा-२०१७/प्र.क्र.१५२/१७/एस.डी-६**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १५ डिसेंबर, २०१८

वाचा -

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१६/(२९/१६)/एस.डी.-६, दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१७/(१५२/१७)/एस.डी.-६, दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१७/(१५२/१७)/एस.डी.-६, दिनांक ०२ जानेवारी, २०१८

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र प्रगतशील राज्य असून राज्यातील शाळा आंतरराष्ट्रीय शैक्षणिक मानके प्राप्त करणाऱ्या शाळा असाव्यात तसेच राज्यातील मुलांना आंतरराष्ट्रीय दर्जाचे उत्तम शिक्षण देण्यासाठी शासनाने दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६ रोजी आंतरराष्ट्रीय शैक्षणिक दर्जाच्या १०० शाळा राज्यात पहिल्या टप्प्यात निर्माण करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आलेला आहे. यानुसार शासन निर्णय दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७ नुसार आंतरराष्ट्रीय शैक्षणिक दर्जाच्या शाळा निर्माण करण्यासाठी निकष निश्चित करण्यात आले आहेत.

शासन निर्णय दिनांक ०२ जानेवारी, २०१८ अन्वये राज्यात निर्माण करावयाच्या आंतरराष्ट्रीय दर्जाच्या शाळांमध्ये होणारे अध्ययन-अध्यापन आंतरराष्ट्रीय मानकांप्रमाणे असण्याकरिता शैक्षणिक दृष्ट्या पुरेसे स्वातंत्र्य व स्वायतत्ता मिळणे गरजेचे आहे. या पार्श्वभूमीवर राज्यात या शाळांच्या संलग्नतेकरिता महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ स्थापन करण्यात आले आहे.

महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (MIEB) हे नवीन मंडळ असून सदर मंडळास आर्थिकदृष्ट्या सक्षम होण्यासाठी १० वर्षांचा कालावधी अपेक्षित आहे. (इयत्ता १ ली ते इयत्ता १० वी) १० वर्षानंतर सदर मंडळ त्यांचे स्वत:चे उत्पन्नाचे स्त्रोत निर्माण करेल. तथापि, सद्य:स्थितीत महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ हे प्राथमिक अवस्थेत आहे. सदर मंडळ कार्यान्वित करण्यासाठी सहाय्यक अनुदान उपलब्ध करुन देणे व इतर अधिकार प्रदान करण्याचा विषय मा.मंत्रीमंडळाच्या दि.११ डिसेंबर, २०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये ठेवण्यात आला होता.

मा.मंत्रीमंडळाने सदर बैठकीत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (MIEB) कार्यान्वित करण्यासाठी सहाय्यक अनुदान उपलब्ध करुन देण्याचा व इतर अधिकार प्रदान करण्याचा निर्णय मा.मंत्रीमंडळाने दि.११ डिसेंबर, २०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये घेतला आहे. मा.मंत्रीमंडळाने सदर बैठकीत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाशी (MIEB) संलग्नित होणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांना **भारतरत्न अटलबिहारी वाजपेयी आंतरराष्ट्रीय शाळा** असे संबोधण्यात यावे.

२) महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाकरीता (MIEB) प्रतिवर्ष १० कोटी एवढा निधी अनिवार्य खर्चाखाली १० वर्षांकरीता सहाय्यक अनुदान या स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येतील.

३) महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाकरीता (MIEB) खर्चाचे नवीन लेखाशिर्ष उघडण्यात यावे.

४) नवीन लेखाशिर्ष मंजूर करुन तरतूद अर्थसंकल्पीत करेपर्यंत महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाच्या आवर्ती / अनावर्ती खर्चासाठी आवश्यक लागणारा निधी हा विभागाच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात येईल.

५) मंडळाच्या आवश्यकतेप्रमाणे कंत्राटी तत्वावर अधिकारी / कर्मचारी / तज्ज्ञ उपलब्ध करुन देण्याचे व खर्चाबाबतचे अधिकार मंडळास प्रदान करण्यात यावेत. तसेच याकरिता आवश्यक नियमावली व सेवा शर्ती शासन मान्यतेने ठरविण्याचे अधिकार मंडळास देण्यात यावेत. आवश्यक नियमावली व सेवाशर्ती अंतिम होईपर्यंत समग्र शिक्षा अभियानाचे प्रचलित नियमाच्या २० टक्के वाढीव इतकी मर्यादा विचारात घेऊन कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१५१२०४२८२६२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Umeshrao Gaikwad

Digitally signed by Santosh Umeshrao Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, serialNumber=bc8833f9e213a7e4dfb9d2b071c9202ea52a04054e53b0c1bbf9e50c90a2cf5c, cn=Santosh Umeshrao Gaikwad
Date: 2018.12.15 12:08:19 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३. मा. विरोधी पक्ष नेता, (विधान सभा/ विधान परिषद), विधानभवन, मुंबई.
४. सर्व मा. विधान सभा सदस्य/ विधान परिषद सदस्य, विधानभवन, मुंबई.
५. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा.
८. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, मुंबई.
९. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे यांचे विशेष कार्य अधिकारी, मुंबई.
१०.संचालक, विद्या प्रधिकरण, पुणे.
११.शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), शिक्षण संचालनालय, पुणे .
१२.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. शिक्षण संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे
१४.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
१५.विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
१६.शिक्षणाधिकारी सर्व(माध्यमिक, प्राथमिक, निरंतर)
१७.कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प/रोखशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, एस.डी. ६